

*“प्रस्तुत पुस्तकातल्या सर्व व्यक्ती व प्रसंग काल्पनिक आहेत. प्रत्यक्षातल्या व्यक्तींशी अगर प्रसंगाशी साम्य आढळल्यास तो योगायोग मानावा.”* अशी एक पुळवाटवजा सूचना पुष्कळ नाटक-कादंबऱ्यात असते. ह्या पुस्तकातल्या लेखात आलेले प्रसंग काल्पनिक असले तरी व्यक्ती काल्पनिक वगैरे नाहीत. वास्तवातल्याच आहेत. आता त्यांच्यापैकी बऱ्याच जणांना लाभलेलं मोठेपण अवास्तव आहे ही गोष्ट निराळी. तेव्हा त्या लेखात आलेल्या व्यक्तींचे प्रत्यक्षातल्या माणसांशी वाचकांना साम्य आढळले तर तो अकल्पित योगायोग वगैरे मानू नये. अतिशयोक्ति हे विनोदाचे महत्त्वाचे अंग मानले जाते. पण ह्या नेतेमंडळींची वक्तव्ये आणि कृती ह्यातली अफाट विसंगती पाहिल्यावर कितीही अतिशयोक्ती केली तरी ती थिटीच पडेल अशी भीती वाटते. ह्या व्यक्तीच आता कल्पनेतून वास्तवात उतरलेल्या चालत्या बोलत्या व्यंग चित्रांसारख्या दिसायला लागल्या आहेत. ह्या पात्रांमुळे साऱ्या सार्वजनिक जीवनाचंच एक विराट प्रहसन झालं आहे. ह्या नित्य नव्या ढंगात चाललेल्या प्रहसनाचे प्रहसन कसे लिहायचे ? बरे, सतत खुर्चीबाजीत दंग असलेल्या ह्या भिडूंचे आणि त्यांच्या आचार, विचार

आणि उच्चाराच्या लीळांचे रंग हे तेरड्या-सरड्यालाही लाजवणारे. त्यामुळे त्यांच्या क्षणोक्षणी बदलत्या कर्तृत्वाची चित्रेही रांगोळीसारखी फुंकरीसरशी उडून जाणारी. त्यातून पब्लिकची आठवणही फारशी टिकाऊ नसते. त्यामुळे तात्कालिक राजकीय संदर्भ असलेले हे लेखन वर्तमानपत्री लिखाणासारखं. यातले बरेचसे लेख महाराष्ट्र टाइम्समधून प्रसिद्ध झाले आहेत. असल्या अल्पजीवी व्यंग-लेखांच्या पानांची जुडी बांधावी की बांधू नये हेही ठरवता येईना. वास्तविक यापूर्वीच तराजूवर तोलून रद्दीवाल्यानी त्यांचं मूल्यमापन केलं आहे. आता पुस्तकरूपाने ते लेख आल्यावर रद्दीवाल्याना पुन्हा एकदा पर्वणी आली असं न वाटो हीच इच्छा.

मधूकाका कुलकर्णी ह्यांनी या लेखांना ग्रंथरूप द्यायचं जोखीम पत्करल्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार.

पु. ल. देशपांडे

## अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| १. | पु.ल. तुम्ही स्वतःला कोण समजता ? | १ |
| २. | भाईसाहेबांची बखर | २० |
| ३. | तू माझी ' माऊ 'ली | ३१ |
| ४. | शेवटचे कवि-संमेलन | ४४ |
| ५. | हवाई सुंदरी, दूरध्वनिकर्णिका आणि सौजन्य | ६५ |
| ६. | तुम्हाला कोण व्हायचे आहे ? मुंबईकर, पुणेकर की नागपूरकर ? | ७१ |
| ७. | काही नव्या राजकीय ध्वनिमुद्रिका | ९० |
| ८. | यशवन्तराव भागिले यशवन्तराव | १०३ |
| ९. | आम्हालाही उबग | १०९ |
| १०. | आम्ही सूक्ष्मात जातो | ११६ |
| ११. | आठ आण्याचे गणित | १३१ |
| १२. | लोकमान्य आणि आम्ही | १३९ |
| १३. | लोकशाही : एक सखोल चिंतन | १५१ |
| १४. | जनता शिशुमंदिरात आम्ही | १६५ |
| १५. | मी–हारून अल् रशीद | १७८ |
| १६. | अंतुलेसाहेब तुम्हारा चुक्याच | २०४ |

## ॥ १ ॥ " पु. ल. तुम्ही स्वतःला कोण समजता ? " ॥

पत्रकार संघातल्या प्रश्नोत्तरांच्या सभेला फक्त कॉफी आणि शेंगदाणे असूनही इतके पत्रकार जमतील अशी खुद्द पुलंनाही कल्पना नव्हती. ( हल्ली पूज्य विनोबा स्वतःचा उल्लेखही " बाबाने कहा, बाबाने ताली बजायी " असा त्रयस्थ भावनेने करतात तसाच आम्हीसुद्धा कधीकधी आमचे 'मीपण सारे गळले हो ' हे ठसवण्यासाठी आमचा उल्लेख पुल असाच करतो. घरातदेखील ' पुलंना कपभर चहा मिळेल का ? ' किंवा ' पुलंच्या आंघोळीचं पाणी काढलं का ? ' किंवा ' रात्री पुलंना नाट्यसमीक्षक डास होऊन चावताहेत असं स्वप्न पडलं ' अशा भाषेतच बोलतो.) पुल पत्रकार संघाच्या सभागृहात आले त्या वेळी हॉल खचाखच भरला होता. काही पत्रकार उभेच होते. शेवटपर्यंत. वास्तविक पंचतारांकित हॉटेलात होणाऱ्या पत्रकार परिषदेत हां हां म्हणता उभे पत्रकार आडवे होतात असेही पुलंनी ऐकले आहे. पण इथे जे पत्रकार उभे होते त्यांनी फक्त पुलंपुढे प्रश्न उभे करून त्यांना आडवे करण्याचा चंग बांधला होता.

पत्रकार संघाचे अध्यक्ष सदू शिंगोटे यांनी ' पुलंची ओळख करून देण्याची गरज नाही ' एवढ्या एका वाक्यात परिचयाचे भाषण संपवले. आणि प्रश्नांची सरबत्ती सुरू झाली. जलदगती गोलंदाजीसारखा पहिला प्रश्न पुलंच्यावर भिरकावण्यात आला. प्रश्न विचारणाऱ्यांची नावे पुलंना ठाऊक नसल्यामुळे त्या त्या प्रश्न विचारणाराचे नाव त्यांनीच ठरवले. शिवाय एकच पत्रकार अनेक नावांनी लिहीत असल्यामुळे कित्येकदा स्वतःचे पाळण्यातले नाव त्याचे त्यालाही न आठवणे साहजिक आहे. मुंबईचे पोलीस जसे अनवधानाने एखादा चोर

पकडतात आणि चौकीवर पाचप्पा पिळ्ळे ऊर्फ उस्मान बर्वादी किंवा सुरेशकुमार अशी त्या एकट्याची तीन नावे नोंदवली जातात तसेच एखादा पत्रकार अनेक नावांनी रकाने भरतीचे काम करीत असतो. तेव्हा पहिला प्रश्न ज्या पत्रकारांनी पुलंच्यावर भिरकावला त्याचे नाव भिरके असावे असे पुलंनी ठरवले. संतापा-शिवाय दुसरा कुठलाच भाव भिरक्यांच्या चेहऱ्यावर उमटू शकत नसावा. भिरक्यांनी उभ्या उभ्या जलद प्रश्नंदाजी केली.

भिरके : पुल तुम्ही स्वतःला कोण समजता ?



" पुल तुम्ही स्वतःला कोण समजता ? "

पुल : ( स्वगत ) तुझा काका ! ( प्रकट ) हा प्रश्न मला वॉशिंग्टनला अमेरिकन जर्नालिस्ट्स् इनकॉर्पोरेटेड्च्या अध्यक्षांनी मी हॅरी ट्रुमनला राजकारणातला एबीसीडी कळत नाही हे विधान केल्यानंतर केला होता. " पीएल् व्हू डू यू थिंक यू ॲ ऽऽ र ? "—त्या वेळी त्यांना दिलेलंच उत्तर मी तुम्हाला देईन.

भिरके : निराळं उत्तर द्या. आम्ही शिळी उत्तरं छापत नाही.

पुल : ( स्वगत ) इंदिराबाई रोज सकाळी चहा थंड मिळाला तरी त्यात संघ आणि जनसंघाचा हात आहे असं म्हणतात ते बरं छापता. ( प्रकट ) शरीफोंकी जबान एक होती है.

भिरके : मराठीत बोला. आपण मराठी पत्रकारांपुढे बोलता आहात हे विसरू नका.

पुल : ( स्वगत ) इंदिराजी तुमच्याशी मराठीत बोलतात का ? ( प्रकट ) सॉरी. आय् शॅल् स्पीक इन् मराठी.

भिरके : थँक्यू. ( प्रश्नंदाजीत भिरके नोबॉल् टाकून जातात. )

शेंडे : पण तुमची अमेरिकन पत्रकारांनी मुलाखत केव्हा घेतली होती ?

पुल : आता सांगायला हरकत नाही. केनेडी आणि ख्रुश्चाव्ह यांच्या संबंधात सुधारणा घडवून आणली पाहिजे असं मी गुळवाडी हेमंत व्याख्यानमालेत ' सद्य:स्थिती ' ह्या माझ्या व्याख्यानात बोलल्याचं सी. आय्. ए. नी केनेडीला आणि के. जी. बी. नी ख्रुश्चाव्हला कळवलं होतं.

शेंडे : ते असेल. पण तुमची आणि जॉन एफ. केनेडीची ओळख कोणी करून दिली ?



" गाणं कुठलं वाजवलं. "

पुल : अर्थातच जॅकी केनेडीनी. मॅसेस्च्यूट्सच्या महाराष्ट्र मंडळात ती माझी पेटी ऐकायला आली होती.

शेंडे : त्या वेळी तुम्ही काय वाजवलं होतं ?

पुल : पेटी ! दुसरं काय वाजवणार ?

शेंडे : ते नाही—गाणं कुठलं वाजवलं ?

पुल : नच सुंदरि करु कोपा....सांगायची गोष्ट, त्यानंतर तिने मला व्हाइट् हाऊसमध्ये जेवायला बोलावलं. चार दिवस इथेच राहून जा म्हणत होती. पुढे केनेडीचा खून झाला आणि ओनॅसिसशी लग्न झालं तिचं. न विसरता त्याची निमंत्रणपत्रिका तिनं मला पाठवली होती. विशेष म्हणजे त्यात ' आहेर स्वीकारले जाणार नाहीत ' असं होतं. तरी मी तिला पोस्टाने एक जरीचा खण पाठवला.

त्याचा तिने स्वतःला झगा शिवला असं मला मागून कळलं. उरलेला तुकडा मॅचिंग पर्सला वापरला.

भिरके : पण माझ्या प्रश्नाचं तुम्ही उत्तर का देत नाही ?

पुल : कुठल्या ?

भिरके : तुम्ही स्वतःला कोण समजता ?

पुल : ( स्वगत ) तुझ्या काकाचा काका. ( प्रकट ) तेच तर सांगत होतो. मला जेव्हा बॅरी सिल्व्हरपॉटनी ' व्हू डु यू थिंक यू ॲ SS र ? ' असं विचारलं—

शेंडे : म्हणजे इंग्रजीतून ही प्रश्नोत्तरं झाली ?

पुल : काही फ्रेंचमधून—

शेंडे : म्हणजे तुम्हाला फ्रेंच येतं ?

पुल : खरं सांगू का ? अलीकडे शासकीय आणि प्राध्यापकीय मराठी वाचताना मला मराठीखेरीज इतर भाषाच चांगल्या येतात असा विश्वास निर्माण झाला आहे. द गॉलशी बोलायला मला फ्रेंच शिकावं लागलं—सार्त्रकडे मी फ्रेंच शिकायला जायचो आणि त्याला मराठी शिकवायचो.

शेंडे : सार्त्रचे काय पॅरिसला पिंगेज् क्लासेससारखे शिकवणीचे वर्ग आहेत ?

पुल : छे छे ! झ्या पॉलच्या ' सिल्वू प्ले मादमोझेल ' नावाच्या फ्रेंच नाटकावर मी न्यूयॉर्करमधून प्युअरसोतम् ल देस पान्द ह्या नावाने समीक्षा लिहिली होती. लगेच त्याचं मोंशेर मस्य ल देस पान्द ह्या मायेन्याचं पत्र आलं. त्या वेळी मला इतकं फ्रेंच येत नव्हतं. ' सिल्वू प्ले मादमोझेल'च्या इंग्लिश भाषान्तरावरून मी ते परीक्षण लिहिलं होतं. नुकताच त्याचा ' बाई जरा इकडे बघा की—' नावाने मराठी फार्स केला आहे. पण झ्या पॉलचं पत्र आलं फ्रेंचमधून. पुण्यातल्या तीन प्रोफेसर्सनी त्याचे तीन प्रकारचे अर्थ सांगितले.

बोळके : आथवतायत् का थे थुमाला ?

पुल : न आठवायला काय झालं ? पहिल्या प्रोफेसरांचा अभ्यास ज्ञानेश्वरकालीन फ्रेंचचा असल्यामुळे आधुनिक फ्रेंच त्यांनी अभ्यासलं नव्हतं—दुसऱ्यांची फ्रेंच इण्टु मराठी डिक्शनरी त्याच वेळी पानशेतच्या पुरात वाहून गेली होती—आणि तिसऱ्या फ्रेंचच्या प्रोफेसरनी तर ' हे सार्त्र कोण ? ' असा मलाच उलट प्रश्न विचारला. मी त्यांचं नाव नाही सांगत पण एका विद्यापीठाचे ते हेड ऑफ द ' फ्रेंच ॲण्ड अर्धमागधी डिपार्टमेंट ' होते. आता तिथून रिटायर होऊन

नैर्ऋत्य महाराष्ट्रात विद्यापीठ काढून तिथले पहिले कुलगुरू व्हायच्या खटपटीत आहेत.



" आथवतायत् का थे थुमाला ! "

शेंडे : हे खरं सांगता आहात की बनवून ?

पुल : पत्रकारांपुढे मुद्दाम खोटं कशाला बोलायला हवं ? ईश्वरसाक्ष खरं सांगतो.

बोळके : तुमचा ईश्वरावर विश्वास आहे ? छान छान.

पुल : माझा ईश्वरावर विश्वास आहे एवढंच नव्हे तर ईश्वराचाही माझ्यावर आहे.

मांडे : पण ईश्वराचा तुमच्यावर विश्वास आहे हे तुम्हाला कसं कळलं ?

पुल : मी विश्वासघात करण्यात पटाईत असतो तर ते ओळखून त्या जगच्चालकानं मला राजकारणात नसतं ढकललं ? मी ईश्वराचा विश्वासघात केला नाही आणि ईश्वराने माझाही केला नाही. वास्तविक मी होऊन तुम्हाला मथळ्याचं वाक्य देतोय याबद्दल माझे आणि माझ्या ईश्वराचे आभार माना. मला धन्यवाद द्या. मजवर प्रीत व्हा. कां की मी हे वाक्य पोपना सांगितलं त्या वेळी त्यांनी लेकरा तुला माझी सहस्र चुंबने घे म्हणून त्यांच्या दोन्ही हातांची आणि एका गालाची अशी तीन चुंबने घेण्याची परवानगी दिली.

मोरे : एकाच गालाचं कां ?

पुल : एका गालावर मारल्यावर दुसरा गाल पुढे करा असं प्रभू येशूचं वचन

आहे, एका गालाचं चुंबन घेतल्यावर दुसरा गाल पुढे करा असं नाही हे पोप जाणतात. त्यांनी माझ्या एका गालाचंच चुंबन घेतलं त्याचं कारण मात्र मी त्या दिवशी नेमका दाढी करायला विसरलो होतो, हे आहे.

मांडे : पोपनी तुमचं चुंबन घेतलं हे खरं आहे?

पुल : पोपच्या बिऱ्हाडात चुंबन घेण्याचं काम पोपनाच करावं लागतं. (स्वगत) काय हे अज्ञान! प्रभू त्यांना क्षमा कर, कां की ते काय ऐकतात व नंतर छापतात ते त्यांचं त्यांनाच ठाऊक नाही. आमेन.

भिरके : पण माझा प्रश्न तसाच राहिलाय!

पुल : कुठला?

भिरके : तुम्ही स्वतःला काय समजता?

मांडे : पण तुम्ही पोपना कधी भेटला होता?

पुल : त्याचं काय झालं, रोममधल्या ईस्टवेस्ट संगीत महोत्सवात मी पेटी वाजवायला गेलो होतो.

भेंडे : मग हे छापून कसं आलं नाही?

पुल : हा प्रश्न वास्तविक मी तुम्हा पत्रकारांना विचारायला हवा! राजनारायणनी शिवाजी पार्कला 'काव काव' असा कावळ्याचा आवाज काढून दाखवला तर ते छापाल पण मी पेटीतून रोममध्ये 'मितभाषिणी हीच कुलकामिनी गृहिणी रुचिरवच वदुनि...'हे गाणं वाजवून गाऊन दाखवलं ते छापणार नाही.

भेंडे : पण सगळं सोडून मितभाषिणी कुलकामिनी गृहिणी–हे जुनं गाणं कशाला काढलंत–चांगलं सणसणीत दिनानाथाचं शूरा मी वंदिले लावायचं नाय?

पुल : ऐका! मितभाषिणी हीच कुलकामिनी गृहिणी सुरू झाल्याबरोबर टाळ्यांचा कडकडाट! मुसोलिनी पेगानिनी मार्टिनी–असे 'नी'नी संपणारे शब्द ऐकल्यावर इटालियन ही मराठीचीच बोलीभाषा आहे याची त्यांना खात्री झाली.

भेंडे : पण पोपला हे कसं कळलं?

पुल : अहो पोपला रोममध्ये खुट्ट झालं तरी कळतं–तिथे इटाली-मराठी भगिनी भगिनी हे मी सिद्ध केलेलं कळणार नाही? शिवाय इटालीला खरं तर 'इटली' म्हणतात. मूळचा तो विठ्ठली देश. विठ्ठलाचा 'इट्टल' झाला–आणि इट्टलाची भूमी–'इटली' झाली. व्हॅटिकन् हे मुळातली 'विठुकान्ह' म्हणजे

कान्हड्या विठूचे मंदिर होते. असो, तो एक स्वतंत्र विषय आहे.

साठे : ते जाऊ दे. पोपशी आपले कुठल्या विषयावर बोलणे झाले ?

पुल : पोपची भेट ही एक रोमहर्षक कथा आहे. ती मी स्वतंत्रपणे लिहिणार आहे.

अध्यक्ष : मला वाटतं की ही कथा पुलंना आपण लिहू द्यावी. एखाद्या दिवाळी अंकाकडून त्यांना त्याबद्दल मिळणाऱ्या पाचशे रुपयांच्या आड आपण येऊ नये.

( पुलंना घेरी येते. त्यांना पाणी देण्यात येते. काय झालं ? काय झालं ? असे आवाज. )

पुलः काही नाही–लेखाचा मोबदला पाचशे रुपये हे ऐकून जरा चक्कर आली एवढंच.

भिरके : अध्यक्ष महाराज, माझ्या प्रश्नाचं उत्तर मला मिळायलाच पाहिजे.

मांडे : अध्यक्ष महाराज, हे भिरके स्वतःला काय समजतात ?

पुल : भांडू नका ! मुंबईतले टॅक्सीवाले रस्त्यात चालणाऱ्यांची छत्री जरी टॅक्सीला लागली तरी " साला देखता नहीं क्या... " अशा मंगलाचरणाने सुरुवात करून त्याची आयमाय उद्धरतात. पण दुसऱ्या टॅक्सीवाल्याने ह्याच्या बंपरवर टॅक्सी आदळली तरी–" जाना दो–जाना दो–" म्हणून विड्या-काड्यांची आलटापालट करतात. पत्रकारांचीही अशीच भाईबंदी असेल असं मी समजत होतो.

सावर्डेकर : पु. ल. साहेब आपण साहित्याकडे कसे वळलात ?

पुल : त्याला कारण माझे चित्रकलेचे शिक्षक.

सावर्डेकर : चित्रकलेच्या शिक्षकांनी तुम्हाला साहित्याकडे वळवले ?

पुल : अक्षरशः ! गाईकडे वळणाऱ्या बैलाला औताकडे वळवावं तसं !

( चांगला विनोद कारुण्यातून निर्माण होत असल्यामुळे हशा. )

रानडे : म्हणजे तुम्ही गोरक्षणाच्या कार्यात समाविष्ट झाला होता ?

( हा प्रश्न विचारणारा पत्रकार, त्याची भाषा, उभं राहण्याची पद्धत आणि माझा विनोद त्याच्या शिंगावरून जाणे ह्यामुळे त्याचे आडनाव रानडे, दामले, चितळे, पेंडसे यांपैकी काहीही असले तरी पाळण्यातले नाव चिन्तामणी असावे याची खात्री पटली. प्रश्न उपस्थित करून रानडयांनी उपविश केले. )

पुल : गायनमास्तरांनी माझा आवाज ऐकून मला सकाळी उठून गोरक्षण फंडाची पेटी फिरवताना म्हणायलाच माझी आवाजी योग्य आहे असे सुचवले होते. शेवटी तडजोड म्हणून फंडाच्या पेटीऐवजी वाजवायच्या पेटीवर माझी नियुक्ती झाली. ते असो. पण माझ्या चित्रकलेच्या मास्तरांनी माझी चित्रकला पाहून मला तू लेखक हो असा सल्ला दिला. ‘ तुम्ही पाहिलेला सूर्योदय ’ असे चित्र त्यांनी आम्हाला काढायला सांगितले. तत्पूर्वी मी काढलेला केळ्यांचा घड हा शेवग्याच्या शेंगा म्हणून त्यांनी पस्तीस मार्कांत स्वीकारला होता. माझा आंबा भोपळ्याच्या कुळात जाई आणि एकदा मी काढलेला मोर पाहून त्यांनी माझ्यावर शिव्यांचा पाऊस पाडून आणि छड्या मारून मला नाचरे मोरा करायला लावले होते. मी जो सूर्योदय काढला त्यातला सूर्य डोंगर म्हणून काढलेल्या आडव्या ड सारख्या लायनींच्या वर चांगला इंचभर आला होता. उडत्या कावळ्यांच्या चार चार अशा आकड्यांची बेरीज चव्वेचाळीस हजार चारशे चव्वेचाळीस झाली असती. माझा हा ल्यांडस्केप पाहून ते प्रेमाने मला म्हणाले—“ गाढवा, सूर्योदयाच्या वेळचा सूर्य इतका वर येतो का ? ” मी म्हणालो, “ सर, मी सकाळी उठतो त्या वेळी तो जितका वर आलेला मी पाहिलेला आहे तोच मी काढला आहे. तुम्ही नुसता ‘ सूर्योदय काढा ’ असं सांगितलं असतंत तर मी डोंगराला चिकटलेला अर्धा सूर्य कल्पनेनं काढला असता. पण मी जे अनुभवले नाही त्याचे प्रकटन मी करणार नाही.” चिमुकल्या पुलंचे हे बाणेदार उत्तर ऐकून त्याचे चित्रकला गुरुजी म्हणाले, “ पुरुषोत्तमा, तू थोर लेखक होशील. ”

सावर्डेकर : लहानपणी सुद्धा तुम्ही प्रकटन वगैरे शब्द वापरत होता ?

पुल : त्या वेळी मी तसं नाही बोललो. पण पुढे कधी तरी जर माझ्या बाल-पणातल्या तेजस्वी प्रसंगावर धडा वगैरे घालायची बुद्धी पाठ्यपुस्तक मंडळाला झालीच तर मी त्याची सोय करून ठेवली आहे. लोकमान्य टिळकांनी शेंगांची टरफलं प्रकरणात वयाच्या सातव्या वर्षी जे वाक्य उच्चारलं ते तरी त्यांच्याशिवाय कोणाच्या लक्षात होते ?

रानडे : बालवयात तुम्हाला कुठल्या साहित्याची आवड होती ? धन्यवाद.

पुल : ( रानड्यांकडे पाहून ) दासबोध, विवेकानंदांचं चरित्र, नेपोलियनचं चरित्र, शिवाजी महाराजांचं चरित्र—

रानडे : म्हणजे तुमचा धार्मिक वाङ्मयाकडे ओढा होता—

( तेवढ्यात एका स्त्री-पत्रकारिणीने प्रवेश केल्यामुळे आमचा जिथे नैसर्गिक ओढा तिथे लक्ष गेले आणि आम्ही उत्तरलो– )

पुल : छे–छे–मुंबईत कुठला ओढा ? आमच्या चाळीपुढे गटार होतं—

मांडे : अहो तो ओढा नव्हे–ओढा म्हणजे आवड असं त्यांना म्हणायचं आहे—

पुल : सॉरी सॉरी. मी विनोद केला. ( ह्या वाक्यावर ती स्त्री-पत्रकारीण, आपल्याला विनोद कळला नाही असं वाटू नये म्हणून माणसं हसतात तशी हसली. )

साळेकर : तुमचं बालपण कुठे गेलं ?

पुल : कोण जाणे कुठे गेलं. पण वयाच्या चौथ्या पाचव्या वर्षापर्यंत ते होतं एवढं आठवतंय. कारण आमचा उल्लेख ' एवढा मोठा घोडा झाला तरी ' ही अक्षरे जोडल्याशिवाय झालेला आठवत नाही.

शेंडे : ( काही कारण नसताना जांभई देत– ) तुमचा आवडता लेखक कोण ?



" मातृभाषेतला कृपया सांगाल का ? धन्यवाद ! "

पुल : शेक्सपियर. ( उगीच भानगड नको. )

रानडे : मातृभाषेतला कृपया सांगाल का ? धन्यवाद !

पुल : मोरोपंत.

सावर्डेकर : आडनाव काय ?

पुल : कुणाचं ?

सावर्डेकर : त्या मोरोपंतांचं.

पुल : जुन्या काळी आडनावं नसत. तुकारामाचं आडनाव काय ?

रानडे : पराडकर. धन्यवाद !

भेंडे : अहो पराडकर कुठलं असेल ? पराडकर दत्त दिगंबर दैवत माझे म्हणतात. तुकारामाचं दैवत विठ्ठल.

रानडे : मोरोपंतांचं आडनाव पराडकर. धन्यवाद !

सावर्डेकर : ते जाऊ दे हो. जिवंत लेखकांपैकी सांगा—

पुल : झ्याँ पॉल सार्त्र—

सावर्डेकर : इंग्लिश लेखक नको, मराठी सांगा—

पुल : इंग्लिश लेखक वाचल्याशिवाय मराठी लेखक होणं कसं शक्य आहे ?

झोंबरे : तुम्हा मध्यमवर्गीय लेखकांच्या बाबतीत हे खरं असेल. ( त्या पत्रकाराच्या दाढीकडे, जाड चष्म्याकडे आणि तोंडावर जिथे जिथे म्हणून उगवणं शक्य आहे तिथल्या घनदाट केसांकडे पाहून अजूनपर्यंत त्याने माझ्या निषेधाची वाक्यं कशी उच्चारली नाहीत याचंच मला आश्चर्य वाटत होतं. ) तुमच्या मागून तुमचं एकही पुस्तक टिकणार नाही याची तुम्हाला कधी खंत वाटते का ? ( झोंबरे हेच याचं नाव असणार. )

पुल : माझ्या मागून कशाला ? माझ्या पुढून देखील माझ्या टेबलावरची माझी पुस्तकं आमचे दोस्त पळवतात—एक पुस्तक टिकत नाही. ( झोंबरे माझी होपलेस केस आहे असा चेहरा करून आपल्याच दाढीचे केस जोरात उपटतात. )

झोंबरे : तुम्ही स्वतःला काय सर्वश्रेष्ठ लेखक समजता की काय ?

पुल : मी कधी असं म्हटलं ? लेनिननी एकदा स्टालिनला म्हटलं होतं— ' कॉम्रेड स्तालिन्, मार्क्सपेक्षा तू स्वतःला श्रेष्ठ समजतोस की काय ? '

झोंबरे : कुठं म्हटलं होतं ?

पुल : बोरोव्हस्की वाचा. किंवा इल्यानोव्हिच आयव्हानोविचचं ' फास्ट



" स्वतःला काय सर्वश्रेष्ठ लेखक समजता की काय ! "

फ्लोज द डॉन ' वाचा. नाही तर त्याचं ' जलद वाहते एक पहाट ' हे मराठी भाषांतर वाचा.

झोंबरे : म्हणजे तुम्ही कम्युनिस्ट साहित्य वाचता ?

पुल : मग तुम्हाला काय वाटलं—फक्त वजनावर विकतो ?

सावर्डेकर : जाव द्या हो. तुमच्या आवडत्या लेखकाचं नाव सांगा—

पुल : पु. ल. देशपांडे ( होऊन जाऊ दे ! )

झोंबरे : तेच मी म्हणतो–तुम्ही काय स्वतःला सर्वश्रेष्ठ लेखक समजता ?

पुल : मी तसं कुठं म्हटलंय ? मी मला आवडतो. तुम्ही तुम्हाला आवडत नाही ?

झोंबरे : मी स्वतःला सर्वश्रेष्ठ पत्रकार समजत नाही.

सर्व पत्रकार (एकमुखाने) : आम्हीही. (हशा. माझ्याशिवाय इतर सर्वांचा.)

मोरे : तुमच्या लिखाणाचं सर्वांत मोठं वैशिष्ट्य तुम्हाला कुठलं वाटतं?

पुल : ते छापलं जातं हे. हे माझंच मत नाही. मराठीतल्या पुष्कळशा साहित्यिकांचं आणि जवळजवळ सर्व समीक्षकांचं हेच मत आहे.

साळेकर : हल्लीच्या मराठी साहित्याबद्दल तुमचं काय मत आहे?

पुल : वैचारिक की ललित?

साळेकर : दोन्ही.

पुल : (आयुष्यातील काही मास केलेल्या अध्यापनव्रताला स्मरून–) मराठी वैचारिक साहित्याचा आपल्याला तीन प्रकारांनी विचार करावा लागेल. (नेहमी कुठल्याही गंभीर प्रश्नाचा तीन प्रकारांनी विचार करायचा असतो हे नवोदित साहित्यिकांनी लक्षात घ्यावे. आणि हे वाक्य म्हणून झाल्यावर कुठलाही विचार न करता पंचेचाळीस मिनिटे बोलावे.)–आपल्याला प्रथम मुकुंदराजापासून सुरुवात करावी लागेल–किंवा इसवी सनाच्या सहाव्या शतकात मीर कासिमाने जी स्वारी केली–

अध्यक्ष : मला वाटतं आपण ललित साहित्याबद्दल सांगावे–

पुल : ठीक आहे. अठराशे अठरा साली जेव्हा पेशवाई बुडाली–

वागळे : बट् व्हॉट् हॅज् पेशवाई बुडाली टु डू विथ मराठी ललित साहित्य?

पुल : (ऐतिहासिक नाटकात केलेल्या कामांना स्मरून–) महाशय, पेशवाई बुडाली नसती तर आज इथे जमलेले नव्याण्णव प्रतिशत पत्रकार पत्रावळीकार म्हणून श्रीमंत दहावे किंवा अकरावे बाजीराव यांच्या मुदपाकखान्यात पाने जोडीत बसले असते, नाहीतर पंक्तीत पाने मांडीत हिंडले असते. आजच्या कवींनी कवितांच्या पंक्ती लिहिण्याऐवजी श्रीमंतांच्या पंक्तीत आपला शिरकाव करून घेण्यासाठी श्लोक पाठ केले असते. कथाकार टेबलाशी बसून कथा लिहिण्याऐवजी बेलबाग, तुळशीबागेत कथा करायला उभे राहिले असते. हरिभाऊ आपटे आपल्या पानात जिलब्या कमी पडल्या हे ओरडूनही कुणी कानावर घेत नाही, हे पाहिल्यावर आपोष्णी घेतानाच 'पण लक्षात कोण घेतो' म्हणाले असते. फडक्यांना त्या दहाव्या किंवा अकराव्या बाजीरावांनी आपल्या शेजारी बसवून घेतलेले पाहून विष्णुशास्त्री खांडेकर प्रल्हाद केशवांच्या कानात 'शाल्पसमान मिळतो फडक्यास मान' असे कुजबुजले असते. आणि प्रल्हादपंत केशवांनी मठ्ठयाचा भुरका मारता

मारता ' दहा हजार वर्षांत असा मठ्ठा झाला नाही ' अशी गर्जना केलेली ऐकून भागानगरातल्या निझामाच्या गळ्यातली मुरगी की एकही टांग तिथल्या तिथे अडकून, आला हजरत, पेशव्यांना, सलाम घ्यावा असे म्हणाला असता ! आज पेशवाई असती तर नाना फडणिसाच्या वंशजाने विजय तेंडुलकरांची बदली पत्रावळ खात्यातून खरकटी खात्यात केली असती. पेशवाई असती तर गोविंद-बुवा करंदीकरांनी

माझ्या मना हाण रगड ।
हा रस्सा फुकट आहे ।
फुकट आहे श्रीखंडपुरी
फुकट आहे ही सुपारी—फुकट्यात आहेत पाने सारी ।

—असली कवनं करून श्रीमंतांस प्रसन्न केले असते. पाडगावकरांनी बाळाजी विश्वनाथांपासून ते ह्या अकराव्या बाजीराव बल्लाळापर्यंत सगळ्यानाच नव्हे तर त्यात घाशीराम, नाना, त्र्यंबकजी डेंगळे ह्या सर्वांना देखील ' सलाम ' ऐवजी 'रामराम' हा कटाव लिहिला असता. गंगाधरशास्त्री गाडगिळांनी सव्वा हात लांबीच्या केळीच्या पानावरची काल्यांची भाजी आणि पाकातल्या चिरोट्यांवर ताव मारता मारता कडू आणि गोड अशा साठा उत्तरी सफळ संपूर्ण होणाऱ्या, तुपाने भरलेल्या पाचा बोटांनी लिहिलेल्या कहाण्या सांगून श्रीमंत बाईसाहेबांच्या व्रतावैकल्यांचे प्रसंग साजरे केले असते. बंडू आणि स्नेहलता नव्हे तर बंडूशास्त्री आणि शास्त्रीणबाई यांच्यावर ललिते लिहिली असती. आणि होनाजी किंवा बाळ यांपैकी कोणाच्या तरी वंशजांनी ती जत्रेत करून दाखवली असती. खऱ्या जत्रेत. पुस्तक जत्रेत नव्हे ! तिथे ललिते होतात ती प्रकाशकाच्या गच्चीवर साहित्यिकांची विमाने आकाशगामी झाल्यावर ! खुद्द ह्या पुल देशपांड्याला तर चंदगडच्या खेड्यापाड्याच्या जत्रेत भारुडे लावून पोट भरावे लागले असते. ( आजही काही दुष्ट समीक्षक आणि समीक्षिका त्याच्या साहित्याला भारूडच म्हणतात ते एक सोडा. ) महाशय, गोपाल भट्ट बिन नीलकंठांनी गडागडावरच्या किल्लेदारांपुढे कथा लावून त्यांच्या छातीच्या कोटाच्या लंगोट्या केल्या असत्या. मराठी साहित्यातले वट्ट कुळकर्णी आज समीक्षक होऊन ह्या मराठीचिये की मराठीयेचे नगरी पुंडावा माजवीत आहेत. पेशवाई असती तर श्रीमंतांच्या वाड्यावरून जरब देणारा हुकूम गेला असता की एकतर श्लोक आर्या वगैरे लिहून कीर्तनकारांच्या उदरंभरणाची

सोय करा अथवा ते नच जमल्यास आपल्या लेखणीच्या फटकाऱ्याने शेतकरी रयतेचा बोर्या करून श्रीमंतांचे खजिने भरण्याचा कुळ ( कर्णी ) धर्म सांभाळा. यात कसूर झाली तर वाड्यावरील श्रीमंतांच्या पंक्तीत तुम्हा कुळकर्ण्यांचे पान आडवे मांडले जाईल ! पेशवाई बुडाली नसती तर साहित्य यांचा अर्थ फक्त भोजनास लागणाऱ्या वस्तू एवढाच राहिला असता. इंग्रज आला. त्याने बुके आणली आणि अलुपिष्टन् साहेबाच्या हाती ती पाने खाली न पडणारी पोथी पाहोन बाळाजीपन्त नातूंनी प्रथम पुण्यात वर्दी दिली की—टोपीकराच्या खाकेतल्या पोथीत वाचण्यासारखे बहुत काही असते—तेव्हा ललित साहित्याविषयी बोलायचे झाले—

अध्यक्ष : मला वाटतं आपण ललित साहित्याचा विषय इथेच सोडून राजकारणाकडे वळावं—

कु. प्रभा : पण त्या आधी 'कुंतला' मासिकाची संपादिका ह्या नात्याने मला आपल्याला एक प्रश्न विचारायचा आहे. माझं नाव प्रभा वसईकर. मला प्रभा म्हटलंत तरी चालेल.

पुल : विचारा की—

प्रभा : मराठीतल्या स्त्री-लेखिकांबद्दल आपलं काय मत आहे ?

पुल : खरं तर मी साहित्यात पुरुष-लेखिका आणि स्त्री-लेखिका असा फरक करत नाही. पण मला मराठी लेखिकांविषयी अत्यंत आदर आहे. जनाबाई, मुक्ताबाई....

प्रभा : त्या नव्हे, हल्लीच्या....

पुल : हां हां—म्हणजे मालतीबाई बेडेकर....

प्रभा : त्या नव्हे अगदी हल्लीच्या !

पुल : आपण मला वयाचा गट कुठला तो सांगाल का ?

प्रभा : साधारणतः माझ्या वयाच्या...

पुल : म्हणजे लक्ष्मीबाई टिळक—

प्रभा : ( इंदिरा गांधी आणीबाणीच्या काळात ज्या सुरात 'जय हिंद' म्हणायला लावीत त्या सुरात— ) तुम्ही माझा अपमान करता आहात—

पुल : लक्ष्मीबाई टिळकांचं नाव घेतल्यावर तुमचा कसा काय अपमान होतो ?

प्रभा : मी काय लक्ष्मीबाई टिळकांच्या वयाची दिसते ?

पुल : बाई, माझं वाक्य पुरं करू द्या—मी म्हणत होतो की लक्ष्मीबाई वगैरे स्त्री-लेखिका तुम्हाला चालणार नाहीत—

प्रभा : तुम्हाला पुन्हा पुन्हा जुन्यातच जायला आवडतं असं दिसतंय—बाकी विनोदी लेखक प्रतिगामीच असतात म्हणा—

झोंबरे : हिअर हिअर—

प्रभा : मी म्हणत होते ते आजच्या तरुण लेखिकांविषयी—

पुल : काय म्हणत होता ?

प्रभा : त्यांचं साहित्य—

पुल : पण त्यांचं वय काय धरू—

प्रभा : साधारणतः पंचवीस ते तीस—

एक आवाज : ही संख्या वयाची की त्यांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांची ?

प्रभा : अध्यक्ष महाराज मी प्रत्येक प्रेस कॉन्फरन्सच्या वेळी पाहते आहे, मला नेहमी अडवण्यात येतं—स्त्रियांनी वृत्तपत्रसृष्टीत येऊ नये अशीच सगळ्या पुरुषांची इच्छा दिसते—

भिरके : तुम्ही स्वतःला काय समजता ? (ह्या भिरक्याला हा एवढाच प्रश्न येत असावा.) मी तुम्हाला हा प्रश्न विचारतोय प्रभादेवी— (माझा सुस्कारा.)

प्रभा : मी तुम्हाला बजावून ठेवते—मला यापुढे प्रभादेवी म्हणालात तर मी तुम्हाला हाजीअली म्हणेन ! नाही तरी रुंगठा शेठपुढे तुमची हाजी हाजी चालतेच.

अध्यक्ष : मित्रहो—इथे जमण्यात आपला उद्देश आपल्या आतल्या बातम्या दुसऱ्यांना देणं हा नसून दुसऱ्याकडून बातम्या काढून घेणं हा आहे. तेव्हा प्रभाबाई तुम्ही प्रश्न विचारा.

पुल : स्त्री-लेखिकांच्या बाबतीत मी एक सूचना करावी म्हणतो. त्यांनी प्रत्येक कादंबरीत आपलं वय द्यावं—

प्रभा : का ?

पुल : सांगतो. त्याचं काय होतं, परवाच मी ‘गालावरती दोन गुलाब’ नावाची कादंबरी वाचली.

प्रभा : काय म्हणता ? कशी वाटली ?

पुल : मस्त. त्यातली काही वर्णनं वाचताना ' अंधारातल्या लावण्या ' हे हरि-पाठाचे अभंग म्हणून गायला हरकत नाही असं वाटलं. आपण खूष. पुरुष लेखक असलं हे जवानमर्द पाकासारखं लेखन करायची ताकदच हरवून बसले आहेत असं आपलं मत आहे. आजच्या स्त्री-लेखिका हा मराठी साहित्याचाच काय पण मराठी छापखान्याचासुद्धा मुख्य आधार आहे असं आपलं स्वच्छ मत आहे. तुम्ही वाचली आहे का ती कादंबरी—

प्रभा : अहो ती मलाच अर्पण केली आहे.....

पुल : ते ठीक आहे. आपल्याला अर्पण केलेली पुस्तकं आपण वाचलीच पाहिजेत असं कुठे आहे ?—उद्या तुम्हाला कोणी ' मधुमेह व त्यावरील उपाय ' अशासारखा किंवा ' ऐतिहासिक भौतिकवादाचा उद्‌गम आणि विकास ' हा ग्रंथ अर्पण केला तर काय तो तुम्ही वाचाल ? मला तर एक वैद्यबुवा हजार रुपये देणगीच्या बोलीवर ' आयुर्वेद निघंटू ' फोटोसकट अर्पण करायला निघाले होते. लेपासारखे आमच्या दिवाणखान्यातल्या खुर्चीला चिकटून बसले होते.

प्रभा : पण ' गालावरचे दोन गुलाब'ची लेखिका अनू मोगरे ही माझी सख्खी आत्या ! माझ्या वडलांची सख्खी थोरली बहीण.

पुल : तुमच्या वडलांचा वयोगट काय ?

प्रभा : माझ्या वडलांच्या वयाशी तुम्हाला काय करायचंय ?

पुल : बायकांचं वय कसं विचारायचं ?

प्रभा : पण माझ्या वडलांचा ललित साहित्याशी काहीही संबंध नाही. ते बँकेतून रिटायर होऊन चार वर्षं झाली.

पुल : म्हणजे धरा साठ अधिक चार चौसष्ट. ' गालावरती दोन गुलाब ' त्यांच्याहून मिनिमम अकरा महिन्यांनी तरी मोठ्या असतील. म्हणजे जवळ जवळ पासष्ठ !

प्रभा : म्हणून काय झालं ?

पुल : आता गालावरचे गुलाब वाचून जर मी फुलं घेऊन त्यांच्या घरी गेलो असतो—

प्रभा : फुलं कशाला ?

पुल : सामान्य माणसं खडा टाकून पाहतात तसं ललित साहित्यात फुलं टाकून पाहतात याचा तुम्हाला अनुभव नसावा ही खेदाची गोष्ट आहे. आता

अनू मोगरे ही पंचवीस वर्षांची तरुणी आहे असं त्या कादंबरीवरून मानून समजा मी माळ्याकडचे चार गुलाब घेऊन त्यांच्या घरी गेलो असतो आणि कुत्रा साखळीला बांधला आहे याची खात्री करून आत शिरल्यावर अनू मोगरे गरम पिशवीने संधिवाताने धरलेले गुडघे शेकत बसलेल्या दिसल्या असत्या तर माझी काय अवस्था झाली असती? अशा वेळी त्यांच्याशी त्यांच्या गुढग्यावर बोलण्याऐवजी आपलाच पाय मागे काढता घेणं इष्ट नाही का?

प्रभा : तुमचे हे विचार प्रतिगामी आहेत.

पुल : अर्थात! अशा वेळी मागे पाय घेणं म्हणजेच प्रतिगामी होणं आहे हे मी मान्यच करतो. मी स्वतःला पुरोगामीही समजत नाही आणि प्रतिगामीही समजत नाही. दिवाळी अंकात लिहिणारा हंगामी लेखक म्हणा हवं तर—

प्रभा : म्हणजे तुमचे पाय मातीचे आहेत हा तुमच्यावरचा आरोप तुम्ही कबूल करता?

पुल : पायाचं काही ठाऊक नाही. त्याचं काय आहे, माझे पाय दुखत होते त्याच वेळी एक सर्वगामी विदुषी कसली तरी वर्गणी मागायला माझ्या घरी आल्या. त्या वेळी मी पायांना मातीचा लेप लावून बसलो होतो. आमची बायको काय? मातीचा लेप लावा म्हटल्यावर चुलीसारखे लाल मातीने तिने माझे पाय गुढघ्यापासून तळव्यापर्यंत सारवून मला राजापुरी पंचा नेसवून बसवलं होतं! त्यामुळे त्यांना माझे पाय मातीचे वाटले असतील. पण मातीच्या पायाचं जाऊ दे! माझं हृदय मातीचं असावं. स्त्री-लेखिकांच्या कादंबऱ्या वाचताना एकदम विरघळायला लागतं. पुरुष लेखकांच्या पुस्तकावर पाचवी आवृत्ती वगैरे वाचून तापायला लागतं आणि समीक्षक दिसला की हृदयातल्या मातीचा गोळा होऊन पोटात उतरतो! विशेषतः नाट्यसमीक्षक. अन्नावरून उठवतात हो—

रानडे : मराठी साहित्यकारांच्या भवितव्याबद्दल काही उद्बोधक आणि मार्ग-दर्शक विवेचन कृपया कराल का? धन्यवाद.

पुल : मराठी लेखकांनी आपलं भवितव्य इंग्रजी लेखकांच्या भवितव्यावर अवलंबून आहे हे ओळखलं पाहिजे. विशेषतः वैचारिक साहित्य आणि नाटकं लिहिणाऱ्यांनी. स्वानुभवाचे बोल सांगतो.

सावर्डेकर : तुम्ही कादंबऱ्या का लिहीत नाही?

पुल : तुम्ही माझी नाटकं पाहिलेली दिसताहेत!

सावर्डेकर : कशावरून ?

पुल : कारण एका प्रेक्षकाने मला हाच प्रश्न फक्त 'त्यापेक्षा' हा शब्द आधी घालून कार्डातून विचारला होता. त्यामुळे हल्ली कादंबऱ्यांवरून नाटकं लिहितात तसा माझ्या नाटकावरून कादंबऱ्या लिहायचा माझा विचार आहे.

मांडे : सध्याच्या राजकीय परिस्थितीबद्दल तुमचं काय मत आहे ?

पुल : एकदा मला जवाहरलाल नेहरूंनी हाच प्रश्न विचारला होता.

मांडे : तुमची नेहरूंशी ओळख होती ?

पुल : त्याशिवाय नेहरूंनी अमेरिकेची मदत घ्या, सोडू नका, हा माझा सल्ला ऐकला असता ? आणि त्या कराराला पी. एल. फोरएटी म्हटलं असतं ?

मांडे : काही लोक त्याला पी. एल. फोर ट्वेंटी म्हणतात !

पुल : हा कम्युनिस्टांचा कावा आहे.

झोंबरे : तुमच्याकडे काय पुरावा आहे ?

पुल : अमेरिकेचा, रशियाचा आणि आर एस एसचा कावा आहे म्हणायला पुरावा लागत नसतो.

मांडे : पुलोद सरकारची कल्पनाही तुमचीच आहे म्हणतात हे खरं आहे का ?

पुल : वास्तविक ते पीएलडी गवर्मेंटच आहे. पण मराठी राज्यभाषावाल्यांचं आणि आमचं मधे जरा फटकलं तेव्हापासून त्यांनी पीएलडीचं शासकीय मराठीत पुलोद केलं.

भेंडे : अरब इस्राएल तंटा मिटवण्याविषयी तुमची काही कल्पना असणारच.

पुल : कुर्ट वाइल्डहॅमनी माझी सूचना ऐकली तर अरब इस्राइल काय जागतिक शांतता नांदेल.

रानडे : आपण सूचना कृपया सांगू शकाल की ती अद्यापि गोपनीय आहे. धन्यवाद.

पुल : सांगतो की. तशी गोपनीय आहे. ( म्हणजे लेकाचे उद्या फ्रंटपेजवर छापतील. ) माझी सूचना अशी की कुर्ट वाइल्डहॅमनी आपल्या अधिकारात युनोतर्फे श्री. राजनारायण, मधु लिमये, बाळासाहेब देसाई, सुब्रह्मण्यम् स्वामी, बलराज मधोक आणि शाही इमाम यांचं शिष्टमंडळ अरब-इस्राइल प्रश्न सोडवायला पाठवावं. बॅ. अंतुले आणि बॅ. विठ्ठलराव गाडगीळ यांना कायदेशीर सल्लागार म्हणून घ्यावं. इडी अमीन यांना असतील तिथून शोधून काढून ह्या

मंडळाचे अध्यक्ष नेमावं. ही मंडळी दोन वर्षं अरबी वाळवंटात उंटावरून हिंडायला लागली की अरब इस्त्राइलच काय पण बेळगावचा प्रश्नदेखील सुटेल. शिवाय उंटावर बसायला इतकी शहाणी आणि अरबीतेली आणि शनवारतेली यांचं भांडण सोडवायला इतक्या तैलबुद्धीची माणसं जगात इतरत्र कुठेही मिळणार नाहीत.

रानडे : शनवारतेली म्हणजे कोण ते कृपया सांगाल का ? धन्यवाद.

पुल : कोकणात ज्यू लोकांना शनवारतेली म्हणतात.

सावर्डेकर : आंतरराष्ट्रीय राजकारणाचा आपला इतका सखोल अभ्यास असेल अशी आम्हाला कल्पना नव्हती. वास्तविक आपणच देशाचे पंतप्रधान व्हायला हवं.

पुल : इतक्या लहान वयात ही जबाबदारी मला पेलणार नाही. नुकतंच माझं साठावं वरीस सरलंय. ८०व्या वाढदिवसाच्या वेळी मी नक्कीच निवडणुकीला उभा राहीन. आपला मला टेकू मिळेल अशी आशा मी व्यक्त करतो.

भेंडे : समजा, आपण पंतप्रधान झालात तर आपलं मुख्य धोरण काय राहील ?

पुल : हे ऑफ द रेकॉर्ड म्हणून सांगतो. सर्व भारतीय पत्रकारांना अनुसूचित आणि मागासवर्गीय जमातीत घालावं असा प्रस्ताव मी पहिल्याच सेशनमधे मांडेन. ( टाळ्यांचा प्रचंड कडकडाट )

भिरके : म्हणजे तुम्ही आम्हाला समजता कोण ?

पुल: आता कसा बरोबर प्रश्न विचारलात ! पण ह्या प्रश्नाचं उत्तर मी पंतप्रधान झाल्यावर देईन—पण हा प्रश्न त्या वेळी तुम्ही मला विचारणार नाही याची मला खात्री आहे. रात्रपाळी करावी लागणाऱ्या पत्रकारांना उगवता सूर्य आधी दिसतो. मला ती दृष्टी असती तर मी लेखक होण्यापेक्षा अग्रलेखक नसतो का झालो ? म्हणजे मग स्वतःच्या खर्चाने व्हिस्की प्यावी लागली नसती.

प्रभा : म्हणजे आपण दारू पिता ?

पुल : त्याशिवाय का इतका वेळ इतकं सुसूत्र बोललो ?

अध्यक्ष : यानन्तर कॉफीपान होईल.

( इथे कसली कॉफी मिळते ते पत्रकारांना ठाऊक असल्यामुळे सर्वजण गरिबांच्या उद्धारासाठी निघालेल्या आणखी एका पक्षाच्या पुढाऱ्याच्या प्रेस कॉन्फरन्सला ओबेरॉय शेरेटनच्या दिशेने धूम ठोकतात. पुल आणि अध्यक्ष कॉफी पितात. आणि कार्यवाह आपण होमिओपथी औषध घेत असल्याचे सांगून कॉफी न पिता शेंगदाणे खिशात घालतात. )